20140910130503450

## मुंबईतील तेलंग स्मारक वसतिगृह, चर्चगेट चे रूपांतर मुलींच्या वसतिगृहात करण्यास व शासकीय वसतिगृहातील जागांचे पुनर्वाटप करण्यास मंजूरी..

# महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्रशिक्षण विभाग
शासन निर्णय क्र.शावगृ २००२/(३४५/०२)/मशि-१
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ जुलै,२००२.

पहा :- १) शासन निर्णय , उच्च व तंत्रशिक्षण आणि सेवायोजन विभाग क्र. जीईएच १०९४/१८४८/मशि-४, दिनांक ३० डिसेंबर,१९९४.

२) शासन निर्णय , उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.तेलंग १०९९/२११/मशि-४, दिनांक २४ ऑगस्ट,१९९९.

३) शासन निर्णय , उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.आय.बाय १०९९/२२४/मशि-४, दिनांक १५ सप्टेंबर,१९९९.

## शासन निर्णय

मुंबई बाहेरून व विशेषत: ग्रामीण भागातून महाविद्यालयीन शिक्षण घेण्यासाठी मुंबईत येणाऱ्या विद्यार्थ्यांची मुंबईत निवासाची सोय होणे अत्यंत कठीण असते आणि म्हणून या विद्यार्थ्यांच्या निवासाच्या सोयीसाठी शासनाने मुंबईत खालीलप्रमाणे ४ शासकीय वसतिगृहांची सोय केलेली आहे :-

१) शासकीय महाविद्यालये वसतिगृह, सी-रोड, चर्चगेट. मुंबई -२०.
२) शासनाचे तेलंग स्मारक वसतिगृह, सी-रोड, चर्चगेट, मुंबई -२०.
३) शासनाचे इस्माईल युसुफ महाविद्यालय वसतिगृह, जोगेश्वरी, मुंबई-६०.
४) सावित्रीदेवी फुले महिला छात्रालय , चर्नीरोड, मुंबई.

२. वरील ४ वसतिगृहांपैकी पहिल्या ३ वसतिगृहांत मुंबईतील शासकीय महाविद्यालये व संस्थांमधील विद्यार्थ्यांना ( विद्यार्थीनींना नाही ) प्रवेश दिला जातो तर ४थ्या ,सावित्रीदेवी फुले महिला छात्रालय , चर्नीरोड, मुंबई या वसतिगृहाची सोय मुंबई विद्यापीठ संलग्नित मुंबईतील महाविद्यालये व संस्थांमध्ये प्रवेश मिळालेल्या विद्यार्थीनींसाठी करण्यात आलेली आहे.

३. सावित्रीदेवी फुले महिला छात्रालय , चर्नीरोड, मुंबई येथे मुलींसाठी ४५४ जागा उपलब्ध आहेत. शैक्षणिक संस्थामध्ये मुलींसाठी असणाऱ्या ३० टक्के राखीव जागा व उच्च शिक्षणासाठी मुंबईमध्ये मुंबईबाहेरून येणाऱ्या विद्यार्थीनींची वाढती संख्या लक्षात घेता उपलब्ध क्षमता अपुरी पडत आहे व सदर जागांपैकी वर्षाला केवळ १०० ते १२५ जागाच नवीन प्रवेशार्थींना प्रवेशासाठी

उपलब्ध होत असल्यामुळे मुंबईतील महाविद्यालये / संस्था यांमध्ये शिकणा-या मुंबई बाहेरील विद्यार्थीनींच्या निवासाचा मोठा प्रश्न उपस्थित झाला आहे.

४. महाराष्ट्र विधानमंडळ स्थायी समितीने मुंबई येथे मुलींसाठी स्वतंत्र वसतीगृह बांधण्याची गरज असल्याचे त्यांच्या अहवालात नमूद केले आहे. तथापि शासनाच्या सध्याच्या आर्थिक स्थितीमुळे मुंबईत मुलींसाठी आणिखी एक स्वतंत्र वसतिगृहाची इमारत बांधणे शक्य नाही. त्यासाठी उपलब्ध व्यवस्था लक्षात घेऊनच याबाबतीत शासनाचे तेलंग स्मारक वसतिगृह, सी-रोड, चर्चगेट, मुंबई -२० हे १२० विद्यार्थी क्षमतेचे मुलांचे वसतीगृह मुलींच्या वसतिगृहात रूपांतरित करण्यास व त्याचे नामांतर **शासनाचे तेलंग स्मारक मुलींचे वसतिगृह** असे करण्यास याद्वारे शासन मंजूरी देत आहे. सदर रूपांतरणामुळे मुंबईतील वरील ३ शासकीय वसतीगृहातील जागांचे पुनर्वाटप खालीलप्रमाणे करण्यांत येत आहे.:-

**१) शासनाचे तेलंग स्मारक मुलींचे वसतिगृह, सी-रोड, चर्चगेट, मुंबई - २०**

| अ.क्र. | शासकीय महाविद्यालये / संस्था | राखीव जागा |
|---|---|---|
| १ | शासनाचे एलफिन्स्टन महाविद्यालय, मुंबई | ६० |
| २ | इतर महाविद्यालये / संस्था | ६० |
| | एकूण | १२० |

एलफिन्स्टन महाविद्यालयासाठी राखीव ठेवण्यात आलेल्या ६० जागा त्या महाविद्यालयाकडून विद्यार्थीनी उपलब्ध न झाल्यास इतर महाविद्यालयातील विद्यार्थीनींमधून भरण्यात येतील. सदर वसतिगृहातील प्रवेश सावित्रीदेवी फुले महिला छात्रालय, चर्नीरोड, मुंबई या मुलींच्या वसतिगृहासाठी असलेल्या नियमांनुसार तसेच सदर वसतिगृहात प्रवेश देण्यासाठी नियुक्त करण्यात आलेल्या समितीद्वारे करण्यात येतील.

**२) शासकीय महाविद्यालये मुलांचे वसतिगृह, सी-रोड, चर्चगेट, मुंबई- २०**

| अ.क्र. | शासकीय महाविद्यालये / संस्था | राखीव जागा |
|---|---|---|
| १ | सिडनहॅम वाणिज्य व अर्थशास्त्र महाविद्यालय, चर्चगेट, मुंबई. | १२५ |
| २ | सिडनहॅम व्यवस्थापकीय संस्था, चर्चगेट, मुंबई . | २० |
| ३ | शासकीय विधी महाविद्यालय, चर्चगेट, मुंबई. | ६२ |
| ४ | शासकीय विज्ञान संस्था, मुंबई. | २५ |
| ५ | राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई | २० |
| ६ | स्वातंत्र्य सैनिकांचे पाल्य | ०५ |
| ७ | शासनाचे एलफिन्स्टन महाविद्यालय | ५० |
| | एकूण | ३०७ |

३/-

३) शासनाचे इस्माईल युसुफ महाविद्यालय मुलांचे वसतिगृह, जोगेश्वरी, मुंबई.

| अ.क्र. | शासकीय महाविद्यालये / संस्था | राखीव जागा |
|---|---|---|
| १ | शासनाचे इस्माईल युसुफ महाविद्यालय, जोगेश्वरी, मुंबई | १० |
| २ | सिडनहॅम व्यवस्थापकीय संस्था, चर्चगेट, मुंबई. | १० |
| ३ | शासकीय विधी महाविद्यालय, चर्चगेट, मुंबई. | २० |
| ४ | शासकीय अध्यापक महाविद्यालय, मुंबई | ०८ |
| ५ | शासकीय व्यवसाय मार्गदर्शन संस्था, मुंबई | १६ |
| ६ | शासकीय विज्ञान संस्था, मुंबई | २६ |
| ७. | शासनाचे एलफिन्स्टन महाविद्यालय, मुंबई | ५० |
| | एकूण | १४० |

मुलांच्या वसतिगृहातील प्रवेश सिडनहॅम महाविद्यालय, मुंबई; इस्माईल युसुफ महाविद्यालय, मुंबई व एलफिन्स्टन महाविद्यालय, मुंबई या ३ शासकीय महाविद्यालयांच्या प्राचार्यांच्या समितीद्वारे प्रचलित प्रवेश नियमांनुसार नियंत्रीत करण्यात येतील. तसेच पदवी / पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या अंतिम वर्षात असणा-या विद्यार्थ्यांना चर्चगेट, मुंबई येथील वसतिगृहात प्रवेशासाठी प्राधान्य देण्यात येईल.

५. वरील शासकीय वसतिगृहांच्या आस्थापना व सुविधाविषयक बाबी शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडून नियंत्रीत केल्या जातील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( अ. पा. भट्टलवार )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सह संचालक, उच्च शिक्षण, मुंबई विभाग, मुंबई.
प्राचार्य, सिडनहॅम वाणिज्य व अर्थशास्त्र महाविद्यालय, चर्चगेट, मुंबई.
संचालक, सिडनहॅम व्यवस्थापकीय संस्था, चर्चगेट, मुंबई.
प्राचार्य, एलफिन्स्टन महाविद्यालय, मुंबई./ प्राचार्य, शासकीय विधी महाविद्यालय, मुंबई.
संचालक, शासकीय विज्ञान संस्था, मुंबई./ संचालक, राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई.
प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालय, मुंबई./ प्राचार्य, शासकीय व्यवसाय मार्गदर्शन संस्था, मुंबई.
अधीक्षक, शासकीय महाविद्यालये वसतिगृह, सी-रोड, चर्चगेट, मुंबई - २०.
अधीक्षक, शासनाचे तेलंग स्मारक वसतिगृह, सी-रोड, चर्चगेट, मुंबई - २०.
अधीक्षक, शासनाचे इस्माईल युसुफ महाविद्यालय वसतिगृह, जोगेश्वरी, मुंबई-६०.
अधीक्षक, सावित्रीदेवी फुले महिला छात्रालय, चर्नीरोड, मुंबई.
खाजगी सचिव, मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण. / खाजगी सचिव, राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण.
... सहाय्यक, सचिव, उच्च व तंत्रशिक्षण.
... व तंत्रशिक्षण विभागातील सर्व सह सचिव/ उप सचिव/ अवर सचिव/ कार्यासन अधिकारी /
नस्ती ( मशि-१ ).